# जोडपी

**-- चं.प्र.देशपांडे.**

( उजव्या हाताला थोडा म्हणजे फूटभर उंच भाग. हा रंगमंच. डाव्या हाताला घनश्याम जगदाळे आरामखुर्चीवर बसला आहे. ताजातवाना, नुकताच अंघोळ झालेला, वर्तमानपत्र वाचतो आहे. पडदा उघडण्यापूर्वीपासून सनई सुरू असावी, म्हटले तर प्रभातवंदनाची, म्हटले तर लग्नाची. किंवा सनईबरोबर पुसटसा लग्नाचा बँडही चालू ठेवावा. असे जरा वेळ. सौ.पूर्णिमा जगदाळे चहाची कपबशी घेऊन येते. लग्नाला तीन-चार वर्षेच झालेले तरुण जोडपे -- )

पूर्णिमाः चहा.
( घनश्याम पाहतो. पूर्ण उघडलेले वर्तमानपत्र हातात. सोयीस्कर घडी करतो. एका हातात धरतो आणि दुसऱ्या हाताने कपबशी घेतो. पूर्णिमा जाते. सनई, बँड चालूच राहावा. घनश्याम चहाचा एकेक घुटका घेत वाचत राहतो. रंगमंचावर एक तरुण येतो. उत्तम कपडे. लग्नाची पहिली रात्र. रुबाबदार उभा राहतो. आतुर प्रतीक्षा. एक तरुणी येते. नववधू -- आकर्षक, सजलेली. स्वस्थ उभी राहते. खाली पाहात. तरुण जवळ येतो. तिच्या खांद्यावर हात ठेवतो. ती दूर होते. )

तरुणः लाजतेस ? ( ती स्वस्थ.) नवरा आहे मी तुझा -- तुझाच.

तरुणीः मला तुम्हाला एक सांगायचंय.

तरुणः सांग.

तरुणीः धक्का नाही ना -- बस-बस --बसायचा ?

तरुणः अं ?

तरुणीः मला एक अक्षल उच्चालता नाही येत हे माहीतच आहे तुम्हाला ?

तरुणः 'र '?( मोठ्यांदा हसतो ) न येईना का ! न येईना ! ते कळून झालंय की सगळं आतापर्यंत.

तरुणीः पण माझं सगळं जीवनच बदलून गेलंय त्यामुळं -- हे कळायचंय तुम्हाला.

तरुणः म्हणजे ?

तरुणीः माझं प्लेम धिक्काललं गेलंय त्यामुळं !

तरुणः प्लेम ! प्लेम ? ( मोठ्यांदा हसू लागतो ).

तरुणीः हसू नका. हसणं सोपं असतं.

तरुणः ( थांबून ) मग काय करू ?

तरुणीः ( अतिशय गंभीर ) माझं प्लेम होतं समीलवल. प्लाध्यापक आहे. आणि त्याचंही माझ्यावल. त्याला माझ्या जिभेचा हा दोष माहीत होता. तलीही. पण त्याच्या आईनं मला पाहिलं आणि तिला हे खटकलं. ती म्हणाली, मला नको असली सून. सून कशी हातीपायी, नाकीडोळी, कानीतोंडी, धड हवी. चालचौघात विचित्ल नाही वाटता कामा असं तिचं म्हणणं. तो एवढा शिकलेला, त्या मानानं सून हवी.

तरुणः बरं मग ? ते कोण समीर महाशय मागं हटले ?

तरुणीः माझ्यामुळं घलात तंटा उभा कलायचा होता का ? मला त्याचा पेच कळला आणि मीच बाजूला झाले.

तरुणः वा ! मोठ्या मनाची आहेस मग !

तरुणीः होय. त्याच मोठ्या मनानं केवळ घलच्या माणसांसाठी लग्न केलंय मी तुमच्याशी. खलं म्हणजे मला दुसल्या कुणाशीच लग्न कलायचं नव्हतं.

तरुणः हरकत नाही. त्यामुळं माझ्यासारख्या फक्त बी.ए. ला एम.ए.बायको मिळाली !

तरुणीः पण तिच्यापासून तुम्हाला कोणतंच सुख मिळू शकणार नाही.

तरुणः ( आता जरा गंभीर होतो. ) म्हणजे ?

तरुणीः माझ्या सल्व व्लुत्ती संपूल्णपणे एका दिशेनं संपूल्णपणे बहाल कलून बसले आहे मी . आता पुन्हा सल्व मागे घेऊन नव्या दिशेला जाणाची शक्ती लाहिलेली नाही माझ्यात.

तरुणः म्हणजे तू जाणूनबुजून, ठरवून घात करते आहेस तर माझा !

तरुणीः होय. आणि तुम्ही याचा कशाही प्लकाले सूड घेतलात तली त्याला माझी तयाली आहे.

( तरुण जरा वेळ नुसता पाहात उभा राहतो. निरपराध्याला शासन करणाऱ्या व्यक्तीकडे त्या निरपराध्याने पाहावे तसा. नंतर झटक्यात रंगमंचावरून उतरतो आणि घनश्यामकडे येतो. अजून घनश्याम वर्तमानपत्रातच. तो तरुण म्हणजे रामचंद्र नावाचा नट आहे.)

रामचंद्रः घनश्याम, नाटकाची सुरुवात म्हटलं तर तू एकदमच भयानक केलेली आहेस. पण कदाचित या प्रकारावर अविश्वासही दाखवता येईल. आणि अविश्वास दाखवला तर सगळं गेलंच मग फुकट ! इतक्या फालतू गोष्टीनं आयुष्यात एवढ्या भयानक उलथापालथी ! नुसतं एका अक्षरामुळं ! बघा, विचार करा, नाहीतर सगळ्यांचेच श्रम फुकट जायचे ! आणि नाटकाची सुरुवात एवढ्या वरच्या सुरावरनं केली आहेस की त्याच्यापुढे हे वाढवणं म्हणजे फार मोठं आव्हान आहे असं नाही तुला वाटतं ?

( घनश्याम एका हातात वर्तमानपत्र धरून नुसता ऐकतो आहे.)

घनश्यामः आलोच. काल पेन मधली शाई संपली होती. ती भरून ठेवली पाहिजे.

बस.( उठतो आणि आत जातो. रामचंद्र बसतो.)

रामचंद्रः ( स्वतःशी ) म्हणजे हा साला आता पेनमधे शाई भरूनच येणार ! धन्य !( वर्तमानपत्र उगीचच हातात घेतो आणि पुन्हा ठेवून देतो.मग नुसता बसून राहतो.)

घनश्यामः ( पेनचे टोपण लावत येत ) कालपासनं उकाडा वाढलाय नाही जरा ?

रामचंद्रः होय ना ! बरं आहे. जातो.

घनश्यामः कुठं जातोस ?

रामचंद्रः काही नाही. मोकळ्या हवेत जातो जरा, उकाडा खरंच वाढलाय !

घनश्यामः अच्छा ! येत जा मधून मधून कधी ! अं ! वेळबीळ मिळतो की नाही ?

रामचंद्रः हो हो, बरंय. ( जातो. नववधू आधीच गेलेली. आता घनश्याम बाहेर निघण्याची तयारी करतो आहे.)

घनश्यामः ( बाहेरून ) काय निघायचं का ?

पूर्णिमाः ( आतून ) हो, हो, आलेच.( काही क्षणांनी ती बाहेर येते. )

घनश्यामः बघू या कसा काय पार पडतोय पहिला प्रयोग !

( दोघेही घराबाहेर पडतात. रंगमचावर आता एक डबल कॉट असून पुढे दोन खुर्च्या -- प्रेक्षकांसाठी ठेवल्या आहेत. दोघेही येऊन खुर्च्यांवर बसतात. नाटकाचा मधलाच कुठलातरी भाग सुरू आहे : --
नववधू- कॉटवर बसलेली. झोपण्याच्या तयारीत. तिचा पती आतून जेवण झाल्यावर हात धुतलेला असा हात पुसत येतो. थोडा वेळ उभा राहतो आणि मग कॉटच्या दुसऱ्या कडेला बसतो. काही क्षण जातात.)

नववधूः फाल उशीर झाला आज ! ( तो स्वस्थ. ) बाला वाजून गेले !( तो स्वस्थ. ) काही काम होतं का ?

( तो काहीच बोलत नाही. कॉटवर त्याच्या जागेवर पडतो. काही क्षणांनी ती उठते. झिरो बल्ब लावते. दिवा मालवते आणि कॉटकडे येते. नुसती पाहते आणि मग आपल्या जागेवर पडते. तो नुसता पडून. जागा. ती झोपी जाते. तो उठतो. सिगरेट, लायटर आणतो. पेटवतो आणि झुरके ओढत बसतो. पूर्णिमा आणि घनश्याम बघत बसले आहेत. पूर्णिमाला हे सर्व पाहून हुंदका फुटतो. गदगदते. सर्वांगाला हिसके बसण्याइतकी रडू लागते. घनश्याम ' पूर्णिमा, ए पूर्णिमा !...पूर्णिमा !' म्हणत तिला शांत करण्याचा प्रयत्न करतो. पण अयशस्वी होतो. इतक्या प्रेक्षकांसमोर आपल्या बायकोने इतके रडणे -- आपलेच नाटक पाहताना -- हे त्याला भयंकर गुदमरवणारे वाटते. तिला घेऊन बाहेर जातो. नाटक सुरूच आहे.)

पतीः (उभा राहून झोपी गेलेल्या पत्नीकडे बघत ) माझ्या हातून एक तर आत्महत्या होईल नाहीतर तुझा खून !

( अंधार होतो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा त्रस्त अवस्थेत घनश्याम घरात खुर्चीवर बसला आहे. पूर्णिमा येते. गुन्हेगारासारखी उभी राहते. घनश्यामचे लक्ष नाही. ती पाहते, मग खाली पाहात उभी राहते.)

पूर्णिमाः माझ्यामुळं खूप त्रास झाला तुम्हाला ! ( घनश्याम काही बोलत नाही.) पण ते प्रसंग सहनच झाले नाहीत मला ! ( थोडा वेळ जातो.) आधी सगळं माहीत असूनही माझ्यावर इतका परिणाम होईल याची खरंच कल्पनाही नव्हती मला ! ( घनश्याम गप्प )....रागावलात ?

घनश्यामः आपापली सुखदुःखं बरोबर घेऊनच असतो आपण सतत ! तुझा दोष नाही !

पूर्णिमाः पुन्हा मी कधीही येणार नाही तुमच्याबरोबर.

घनश्यामः ( सुस्कारून ) पण खरं म्हणजे इतके हुंदके फुटावे असं त्यात काही नव्हतंच...( स्वस्थ बसून राहतो. तीही उभी. काहीतरी बोलायला तोंड उघडते. पण बोलत नाही. मग जरा वेळाने आत निघून जाते. तो

तसाच बसून.) खरं की नाही ? कशाचा इतका परिणाम झाला तुझ्यावर ? ( तिचे उत्तर नाही.) अं ? की तुझं

काही वेगळंच विश्व चालू असतं ? मला माहीत नसलेलं ?( पाहतो. ती आत गेलेली. सुस्कारतो आणि बसून राहतो... नंतर रामचंद्र आणि नववधूची भूमिका करणारी नटी ऊर्मिला गळ्यात गळे घालून चालत प्रवेश करतात. एकमेकांच्या प्रेमभावनेत मग्न.)

रामचंद्रः कालच्या प्रयोगात एक मजाच झाली. तू चक्क म्हणालीस -- अणि तुम्ही याचा कशाही प्लकाले सूड घेतलात तरी त्याला माझी तयाली आहे. ' तरी !'

ऊर्मिलाः ए, जाऊ दे ना ते ! कुणाच्या लक्षातसुध्दा आलं नाही.

रामचंद्रः पण माझ्या आलं ना ! मी स्टेजवर एकदम जामच झालो ! म्हटलं, सालं हे नाटक चाललंय का खरं काही चाललंय ? क्षणभर नुसता दचकूनच राहिलो ! म्हटलं, सालं ही काही नाटकातली बायको बोलत नसून चक्क लवकरच आपली होणारी बायको ऊर्मिलाच बोलते आहे !

ऊर्मिलाः ए राम, ( लाडिक राग ) जाऊ दे ना ! असले भयंकर विनोद करायला आवडतं तरी कसं तुला !

रामचंद्रः थांब, थांब, थांब ! एवढ्यावरच संपलं नाही ते ! प्रयोग झाल्यावर अविनाश भेटला आणि काय म्हणाला ? - ते सूड घेणं वगैरे वाक्य आहे नं त्यानंतरच्या मोमेंटला तू जे काय केलंस-- वा ! फँटॅस्टिक एक्स्प्रेशन ! खरंच -- ! आता अशा वेळी नटानं खरं म्हणजे ' सॉरी ! ' म्हणायला पाहिजे ; पण मी आपलं नेहमीप्रमाणे ' थँक्यू !' म्हणालो.( ऊर्मिला हसते.) तुझ्या एका चुकीमुळं आमच्या आयुष्यातल्या एका खऱ्या गोष्टीलाही दाद मिळून गेली !( दोघेही हसतात.)

ऊर्मिलाः तुला हिंदीतल्या त्या नटाची गोष्ट माहीत आहे ना ! त्याला आजारपणातला एक घोगरा आवाज पाहिजे होता. तर त्यानं काय केलं असेल ? जरा वेळ बर्फ खात राहिला आणि मग गरमगरम कॉफी प्याला. मग पुन्हा बर्फ आणि मग पुन्हा कॉफी ! की मिळाला घोगरा आवाज ! नंतर दोन-चार दिवसांचा आजार झाला, पण शुटिंग फर्स्ट क्लास झालं. सीन मस्त वठला !

रामचंद्रः आणि लोक म्हणाले,' काय थोर नट ! ' -- हुं ! हा कसला थोर नट ? हा तर खऱ्या गोष्टीची दाद मागणारा भिकारी !

ऊर्मिलाः बरं ! ए, आता आपल्या लग्नाबद्दल बोलू या नं आपण ! ते मला फार आवडतं.

रामः हं ! चालेल. बोलू या ! ( गंभीर होत ) पण हे बघ, ऊर्मी, तुझ्यावर माझं इतकं प्रेम आहे की लग्नापूर्वी तुला माझी सर्व माहिती असायलाच हवी असं मला वाटतं ! काहीही लपून राहता कामा नये !

ऊर्मिलाः ( लाईटली ) आता काय माहिती व्हायची राहिली आहे मला तुझी !

रामचंद्रः माझ्या स्वभावात एक-दोन फार मोठे दोष आहेत ! आणि ते तुझ्या कधी लक्षात आले नसण्याची शक्यता आहे !

ऊर्मिलाः ( त्याच्या गळ्यात हात टाकत ) ते कोणते बाई ?

रामचंद्रः ( तिला बाजूला करत ) कधीकधी मी एकदम घाबराघुबरा होतो. मनात कसली तरी एक प्रचंड भीती साठून येते. कसली भीती ते अजून मला समजलेलं नाही आणि ते समजून घेण्याचा मी प्रयत्नही केलेला नाही ! ते धाडसही नाही माझ्यात ! त्यावेळी मी त्या भीतीपासून दूर पळण्याच्याच प्रयत्नात असतो. एक प्रचंड लढाई चालू असते माझ्यात. सगळंच निरर्थक वाटायला लागतं ! त्यातूनही मी सावरला कसा जातो हे एक आश्चर्यच !

ऊर्मिलाः आणि दुसरा दोष ?

रामचंद्रः मला मानापमानाची फार प्रखर जाणीव आहे ! उगीचच कुणी मला काही बोललं, हीन लेखलं, तर माझी झोपच उडते ! अक्षरशः मी तळमळत राहतो !

ऊर्मिलाः ठीक आहे. या दोन्ही दोषांसकट तुम्ही आमचे आहात आणि आम्ही तुमच्या ! ( त्याला मिठीत घेते. तो स्वस्थ उभा.) खरं नाही वाटत ?

रामचंद्रः अं ? वाटतं ना ! वाटतंच ! मला वाटलंच होतं की, या दोषांना तू कःपदार्थ लेखशील !

ऊर्मिलाः मग असं का ?

रामचंद्रः काय ?

ऊर्मिलाः तुमचे हात ?

रामचंद्रः अं ?

ऊर्मिलाः अं ? अं ? अं ? ( त्याचे हात आपल्या भोवती घेते.) हं ! हे असं ! बरोबर ? ( दोघेही हसतात.त्याचे हसू थोडेसे कसनुसे.)

रामचंद्रः तू माझ्या आयुष्यात आल्यापासून एक फार मोठा दिलासा सापडला आहे मला ! नाहीतर मी अगदी एकटा,एकटा,एकटा राहिलो असतो !( मिठीत उभे. अंधार होतो ....पुन्हा लग्नाचा पुसट बॅंड वाजू लागतो. काही क्षण वाजत राहतो.प्रकाश पडतो. घरात घनश्याम आणि पूर्णिमा. रामचंद्र आणि ऊर्मिला प्रवेश करतात.)

घनश्यामः ( ताबडतोब लक्ष जाऊन लगेच उठत उत्साहाने ) अरे वा वा, या ! छान ! ! या या या ! ! ! ( रामचंद्र आणि ऊर्मिला सुहास्यवदनाने पुढे येतात. ) वा वा ! अरे वा ! व्हेरी गुड ! थांब, थांब, थांब ! थांबा, जरा असेच थांबा ! हलू नका हं ! असेच थांबा ! पूर्णिमा जरा कॅमेरा आण बघू आपला ! कॅमेरा आण ! चल, चल, लवकर ! ( पूर्णिमा आत जाते आणि कॅमेरा घेऊन येते, देते.) हं ! ( कॅमेऱ्यात बघत ) हं । थोडं, हं, थोडं मागं व्हा पाहू ; अजून; हं, थोडं अजून ; यस ! बस, अजून थोडं ! अजून थोडं ! ( आता रामचंद्र आणि ऊर्मिला अगदी मंचापर्यंत आले आहेत. आता मागे जाणे म्हणजे त्यांना मंचावर चढणेच भाग आहे.) हं बास. आता थोडंच ! ( चढतात.) आता अगदी थोडं ! ! हं बास ! आता तुम्ही बरोबर रेंजमधे आलेले आहात ! हं, थोडं हसा. हसा ! अरे हसा ! अगं ऊर्मिला, जरा मोकळं हास !हं ! आस्सं ! रेडी ! वन टू थ्री ! ( क्लिक. फोटो काढून झाल्यावर सगळे मोकळे हसतात. हालचाली ढिल्या होतात.)

रामचंद्रः ऊर्मी, आपला पहिला फोटो आपल्या लेखकानं काढला ! अं ! ( हसतात. )

घनश्यामः व्हेरी गुड ! साला तुम्ही नाटकातल्या नवराबायकोपेक्षा असेच जास्त खरे वाटताय ! वा ! आपलं पुस्तक निघेल तेव्हा कव्हरवर तुमचा हा आत्ता काढलेला फोटो टाकू या ! अगदी खऱ्या नवराबायकोसारखे दिसताय तुम्ही ! ( हे शेवटचे वाक्य अगदी एखाद्या वेड्याच्या प्रामाणिकपणाने म्हणतो. त्याच्याकडून हे सगळे जरा सगळ्यांनाच अनपेक्षित. सगळे काहीसे विचित्रपणाने एकमेकांकडे बघतात. घनश्याम खो खो हसू लागतो. तेव्हा ही सगळी चेष्टा चालली होती असे समजून सगळेच हसण्यात सामील होतात. अर्थात अगदी मोकळेपणाने नाही. हसता हसता घनश्यामच्या हातून कॅमेरा निसटतो आणि जोरात खाली पडतो. तो हसत हसतच जाऊन कॅमेरा उचलतो आणि निरखून पाहतो.) खलास ! नेमकं भिंग फुटलं !( प्रकाशाची विचित्र हालचाल. ) नशीब ! तुमचा फोटो काढून झाल्यावर फुटलं । आता यातून काहीच आहे तसं दिसणार नाही ! सगळे फोटो खोटे येतील किंवा फोटोच येणार नाहीत ! रामचंद्रा, तुझी लीला अगाध आहे ! नाव काय ठेवलंस हिचं ?

रामचंद्रः नाव नं, जास्त बदल नाही केला. ऊर्मिलाचं नुसतं ऊर्मी केलं ! बास.

घनश्यामः वा वा ! छान ! या भिंगाला ऊर्मी आली आणि त्या नादात ते फुटून गेलं ! छान ! आता आपण काहीतरी, चहा पिऊ या ! प्यायचा का ? ओ.के.! पूर्णिमा, जा पाहू ! ( पूर्णिमा चहा आणायला जाते.) साला आनंदानं सुध्दा माणूस एखादवेळेला खुनशी होण्याची शक्यता असते ! दाट ! ( रामचंद्र बसतो.) का ? अगदी थकल्यासारखा बसलास ?

रामचंद्रः हं खरंच, थकलोच आहे.

घनश्याम : शिवाय हवा ही अशी पावसाळी टाईप !

रामचंद्रः हो ना !

घनश्यामः अरे मग सगळेच बसून बोलूया की ! बसा बसा ! बस, ऊर्मी ! ( बसतात. ) या पोषाखात अगदी मस्त दिसतेयस तू ऊर्मिला ! टॉप !

ऊर्मिलाः छे काहीतरीच !

रामचंद्रः अशी हवा असली आणि मी थकलेला असलो नं की मला माझ्या आजीची आठवण येते.

घनश्यामः ती का बाबा ?

रामचंद्रः ती उठायची, आत जायची आणि येताना गरम-गरम चहा घेऊन यायची !( पूर्णिमा चहा घेऊन येते ).

घनश्यामः ही आली पाहा ! घे चहा ! अरे, तुझी आजी काय न् माझी बायको काय, चहा तो चहा ! घ्या ! घे. ऊर्मी आपलं ऊर्मिला ! घ्या ! अरे, तुझी आजी ही तुझ्याइतकीच आणि तुझ्यासारखीच-- तशीच जर तीच माझीही आजी असती ना तर आज ही ऊर्मिला माझी बायको असती आणि ही पूर्णिमा आज एक नटी असती !( सगळे हसतात.) आणि मी रामचंद्र असतो आणि तू घनश्याम जगदाळे असतास ! काय !

रामचंद्रः कदाचित तसंच असेल ! ( सगळे हसतात.) वा ! झकास ! चहा म्हणजे अगदी फर्मास ! वा! अगदी

आजीचाच ! आणि मग असा चहा घेतल्यावर ना मला यायची झोप ! आणि मग आजी एक छान जुनंसं -
थोडं फाटकंसं -- असं एक ऊबदार घोंगडं टाकायची अंगावर ! बास ! मस्त वाटायचं ! म्हणजे कसं की मला त्यावेळी फार मस्त वाटलं असणार हे नंतर जागं झाल्यावर कळायचं !

ऊर्मिलाः अय्या ! मज्जा !

पूर्णिमाः पण मी तर तुम्हाला अगदीच आजीबाई वाटत नाही ना ?

रामचंद्रः छे छे छे छे ! भलतंच काय ! छे !

घनश्यामः सारांश, ही पूर्णिमा चहा देत असताना तरी तुला तुझी आजी आठवायला नको होती ! असो !( हसतात .)

रामचंद्रः तुमची जर हरकत नसेल तर आता मी थोडा रिलॅक्स् होतो.

घनश्यामः ओ यस् ! हरकत कसली त्यात ! ( पूर्णिमा कपबशा उचलते. )

ऊर्मिलाः: चला. मी पण येते आत.

पूर्णिमाः नको नको, थांब तू ! ही आलेच मी !( जाते. काही क्षण रिटायर्ड शांतता. घनश्याम स्वस्थ बसून. रामचंद्र डोळे मिटून. ऊर्मिला उठून उगीच इकडे तिकडे बघते आहे. घनश्यामवर थोडा फिकट निळसर प्रकाश. त्याच्या डोळ्यांत आठवणीचा थकवा. टेपवर पूर्णिमाचा आवाज 'असेच रात्रभर बसून राहणार का तुम्ही ! सिगरेट ओढत !....अं ?' घनश्यामचा हात -- जणू काय हातात सिगरेट असल्यासारखा. काही क्षण. मग तोच प्रकाश रामचंद्रावर. टेपवर ऊर्मिलाचा आवाज. ' ए ए ए,किती, किती, ( जोरात ) ए ऽ । राक्षस ! राक्षस आहेस तू ! राक्षस ! ए ऽ ऽ । ए, नको, नको ना...( आता दुबळा आवाज ) खरंच नको ! अं हं हं हं हं...( जरा वेळाने शांतपणे ) रानटी वारा आहेस तू नुसता ! वारा ! ...' .( हळूहळू निळसर प्रकाश जातो. पूर्णिमा येते.)

ऊर्मिलाः ( रामचंद्राला ) अरे, माझा भत्ता घ्यायचा राह्यलाय की ! दोन वेळचा !

रामचंद्रः ( अर्धवट झोपेतल्यासारखा ) हं !

पूर्णिमाः हं, काय ? कसला भत्ता म्हणालीस -- तुझे हिशोबठिशोब राहू देत की जरा आता !

ऊर्मिलाः अग नाही, अशीच आठवण झाली.

पूर्णिमाः कळणाऱ्या नाटकाचं एक तरी बरं नाही ? -- पैसे मिळतात.

ऊर्मिलाः नाही तर काय, या असल्या नाटकात काम करून काय मिळतं आम्हाला ? शिवाय कळतही नाही धड !

घनश्यामः ए ए ए ! ( हसतात. जरा वेळ जातो. मग --) कधीकधी आपण नक्की का हसलो, कशाला हसलो, तेच कळत नाही.

ऊर्मिलाः ( सस्मित ) आत्तासारखं !--

धनश्यामः हं ऽ ऽ । आणि असेच मग हसता - हसता न कळणाऱ्या नाटकांचे जन्म होतात. त्यातून कुणाला काय मिळतं नकळे !--

ऊर्मिलाः इश्श ! इतकं काय मनाला लावून घेता !

घनश्यामः मनाला लावून घेण्यासारखं आणि इतकं फालतू या नाटकांत किंवा त्यांच्या बाबतीत काही नसतं ! मनाबिनाला लावून घ्यायचं, बरं वाटायचं, वाईट वाटायचं असं निश्चित काही नसतंच त्यात ! सगळंच बेभरवशी !

रामचंद्रः ( जणू जागा होत ) आता बेभरवशी म्हणतोस ना तू ! करेक्ट ! मी म्हणतो साला निश्चित असं असतंच काय ? सांगा, निश्चित असं काय असतं ?

ऊर्मिलाः मला वाटलं तुम्हाला झोप लागली !

रामचंद्रः सांगा, काय निश्चित असतं ? चला, वहिनी तुमच्यापासून सुरुवात ! पहिल्यांदा तुम्ही सांगा.

पूर्णिमाः ( जरा हसतच राहते. ) इश्श ! मी काय सांगणार ! ( अजून हसते.)

रामचंद्रः नाही, नाही, असं म्हणू नका ! विचार करा किंवा विचार न करता बोला ! बोला, बोला !

पूर्णिमाः ( हसत, उथळ विचार करीत ) निश्चित ?...निश्चित...निश्चित...काय बाई...काय असतं निश्चित...हं तसं सगळं निश्चितच तर असतं की ! मी सकाळी स्वयंपाक करणार, हे जेवून नोकरीला जाणार, रात्री किंवा सुट्टीच्या दिवशी काही लिहिणार, तुम्ही लोक त्याचं काहीतरी करणार, कुणी बरं, कुणी वाईट म्हणणार...

रामचंद्रः आणि मी मधेच कधीतरी तुम्हाला विचारणार की निश्चित काय असतं ते सांगा आणि तुम्ही हे सगळं सांगणार ! (सगळे हसतात.) ओ.के.! म्हणजे भ्यायचं काही कारण नाही. अच्छा !आता तू सांग, ऊर्मिला !

बोल !

ऊर्मिलाः ( बेफिकिरीनं ) निश्चित का अनिश्चित त्याचा मी कधी विचार केला नाही आणि करणारही नाही ! जे आहे त्यात मस्त बुडून जाणं चांगलं असतं !

रामचंद्रः घनश्याम, ( गंभीरपणे ) मी तर एक गोंधळलेला माणूस आहे ; मला काहीच कळत नाही ...

घनश्यामः ( अंतराळात पाहात ) आपण सगळेच एक अटळ असा निश्चितपणाचा शाप भोगतो आहोत. आपली आपल्याला पक्की माहिती असणं हा एक भयंकर शाप आहे ! शाप ! माझ्यातून माझी सुटका नाही, तुझ्यातून तुझी सुटका नाही ! फक्त अनंत छळ असतो हा !

ऊर्मिलाः आग्र्याहून सुटकेसारखी यात काही पेटाऱ्यांची वगैरे सोय नाही का हो ?( फक्त पूर्णिमा हसते.)

रामचंद्रः ( एकदम अनपेक्षित दुबळा होऊन घाबऱ्या आवेगाने ) खरं आहे घनश्याम, खरं आहे. माझा अंत मला स्पष्ट दिसतोय...वेडा होणार आहे मी... वेडा ! घनश्याम, मला मदत हवीय कुणाची तरी -- ( त्याचे हात हातात घेत ) तुझी मदत हवीय मला...घनश्याम...खरंच वाचव मला...तू...तूच...( हुंदके देत मान खाली घालतो. या प्रकारानं सगळेच स्तिमित.)

ऊर्मिलाः ए, हे काय ! हे काय !

पूर्णिमाः अहो भाऊजी, असं काय करता ? सहज गंमतीत तर चाललं होतं ! अं ! (एक-दोन क्षण सगळेच शांत ). सहज गंमतीत तर चाललं होतं -- !

घनश्यामः ( प्रचंड आवाजात ) या तुमच्या सहज गंमती बंद करा ! ( बायका दचकून उभ्या. ) गंमत नाही आहे ही ! गंमत नाही आहे ! स्वतःचं वजन एका असह्य अटळपणानं ज्यांना जाणवू शकतं त्यांना...कुठलीच गोष्ट ही एक सहज गंमत असू शकत नाही...कधीही नाही...आपल्याच अनुभवांचं, आठवणींचं, ताणतणावांचं वजन...

ऊर्मिलाः प्लीऽज स्टॉप धिस रबिश ! चल, राम, बास झालं -- ! खूप विचार झाला ! खूप झाला ! चल !

रामचंद्रः नाही, ऊर्मी खरंच...खरंच थांबवता येतच नाहीत ते ...विचार...ते केलेच जातात...केले जातातच...

ऊर्मिलाः हं ऽ...( सुस्कारते आणि खाली बसते. )

घनश्यामः मला वाटतं, जाणवण्यातला कमीजास्तपणा सोडला तर प्रश्न स्पष्ट आहे ! आपला प्रश्न -- आपणच प्रश्न ! एखाद्या प्रचंड कातळाहून ठळक आणि अघोरी ! ( एकदम संचारल्याप्रमाणे ) आणि आपण म्हणजे तरी काय ? -- आपला अनुभव, आपलं भविष्य... आपले सर्व संबंध... ही नाती साली सगळी निश्चितता निर्माण करतात...आपल्या नात्यांत आपल्या मर्यादा गोठलेल्या असतात. ती तोडायला हवीत. नाती तोडायला हवीत ! विस्कटून टाकायला हवीत ! चोळामोळा करून टाकायला हवीत ! समजलं ?
समजलं ? ? समजलं ? ? ? ( फिकट निळा प्रकाश पडतो.संवादांचे अर्थच सगळे शारीर स्तरावर येतात.)

ऊर्मिलाः ( उठून,जणू बलात्कारापासून वाचण्यासाठी ) नाही, नाही, मला ते जमणार नाही ! खरंच नाही जमणार --

पूर्णिमाः आणि मलाही...मलाही नाही जमायचं .. खरंच...खरंच... (सगळे एकमेकांकडे सावल्यांप्रमाणे पाहताहेत. )

घनश्यामः खरं आहे ! खरं तर आम्हालाही नाही जमायचं ते ! म्हणूनच --तेच करायचंय !तेच ! । तेच । । ( रामचंद्र नुसता डोळे विस्फारून पण अगतिकपणे पाहतो आहे. निकरावर.) राम, तू इकडे ये -- आणि तू ये, ऊर्मिला -- ( ती तशीच उभी. रामचंद्र तिच्याकडे भीक मागितल्यासारखा बघतो. ती येऊन त्याच्या जवळ उभी राहते.) व्हा मागे ! अजून, अजून जरा, आता थोडंच, हं -- ( आता दोघेही मंचापर्यंत आलेली. मंचावर हळूहळू तोच निळसर प्रकाश पसरतो. आता तिथे दोन कॉट्स् आहेत.) हं थोडं,चढा वर,चढा, हं ! हं !। बस !!! आता काय आहात तुम्ही ! अं ! फक्त पात्रं ! नाटकातली **!** कसा आहे हा
मार्ग ? ( सगळ्यांना ) आता आहे का काही जमायला हरकत ? दोन पात्रं ! आणि दोन माणसं ! ही ऊर्मिला -- नाटकातली -- 'र ' म्हणता न येणारी ! आणि पूर्णिमा, हा आहे रामचंद्र --नाटकातला-- दिलदार तरुण ! ( किंचाळतो -- ) चला ऽ ।।। ( सावकाश ) चला,चला,चला ! वेळ नका घालवू, आता वेळ नका घालवू ! ( पूर्णिमाला घेऊन मंचावर चढतो आणि तिला रामचंद्रकडे अलगद सोडतो. आणि स्वतः ऊर्मिलाकडे जातो. दोन कॉट्स् जवळ अशी दोन विस्कटलेली जोडपी उभी. रामचंद्राला -- ) हं चालू द्या ! -- कमॉन्,ऊर्मी, माय ऊर्मिला ! ओह, हाऊ स्वीट् ! ( ऊर्मिलाला जवळ घेतो. तिकडे रामचंद्र पूर्णिमाला घेण्याच्या प्रयत्नात. सुरुवातीला बायका जरा ताठर पण हळूहळू सैल पडतात. शृंगारक्रियांत

सामील होत जातात. या दृश्याच्या वेळी प्रकाश निळसरच पण फिकट -- अगदी पुसट ठेवावा.)

ऊर्मिलाः ( घनश्यामचे हात जणू तिच्या अंगावरून फिरताहेत ) बलं वाटतंय ! खूप बलं वाटतंय ! असंच ! असंच ! जादू भललीय तुमच्या बोटांत ! जादू !( घनश्याम फक्त तिच्या डोळ्यांत पाहात...गर्क...)

पूर्णिमाः ( दबल्या आवाजात ) हळू ना जरा ! किती, किती, किती ! ( रडका स्वर )उं ऽ ऽ अंहं,अंहं,अंहं.
( अंधार होतो. अंधारात ऊर्मिला ' आह- ' करते. पूर्णिमा 'आई ग--' म्हणते. सनई आणि बँड यांचे जोरदार संगीत. मधल्या काळात चौघांच्याही चेहऱ्यांना काळा रंग फासून ते काळ्या कुट्ट दगडी शिल्पासारखे भावहीन --एक्स्प्रेशनलेस म्हणा -- करून टाकावेत. अर्थात ते प्रेक्षकांच्या लगेच लक्षात यायला नको. आता नॉर्मल प्रकाश पडत जातो, तेव्हा चौघेही आपापल्या कॉट्स् जवळ एकमेकांजवळ पाठमोरे उभे. प्रथमतः त्यांचे चेहरे न दिसता खालील संवाद.)

ऊर्मिलाः बाहेर गार वारा सुटला आहे आणि तुम्ही...तुम्ही आहात माझं पांघरुण...ऊबदाऽर पांघरुण...

पूर्णिमाः ( रामचंद्राला ) बाहेर खूप गार वारा सुटला आहे का हो ?

घनश्यामः ( ऊर्मिलाला ) हं, खूप गार वारा !

रामचंद्रः बाहेर गार वारा सुटला आहे.( आता घनश्याम वळतो. बाजूला होतो. मंचावर समोर येऊन उभा राहतो.)

घनश्यामः ( दगडी चेहऱ्याने सरळ उभा राहून ) माझ्या एका पात्राला 'र' म्हणता येत नव्हतं.

ऊर्मिलाः ( तशीच वळून येऊन त्याच्या शेजारी तशीच सरळ उभी राहून ) आता मला म्हणता येतं ! ( ओरडते ) र ऽऽऽ ।।। र, र, र, र, र, र, र, र, ! ! ! ! ( त्याचे प्रतिध्वनी येतात.)

रामचंद्रः ( हा तिसरा. तसाच रांगेत उभा राहून ) ऊर्मिला खरंच एक चांगली नटी आहे...नाही नाही...पूर्णिमा ही खरंच एक चांगली नटी आहे...

पूर्णिमाः ( रांगेत उभी राहून ) आणि मला काहीच कळत नाही...

घनश्यामः ( काही क्षण रिकामे सोडून ) नाती विस्कटून नष्ट करता येत नाहीत !

ऊर्मिलाः ती फक्त बदलता येतात !

रामचंद्रः किंवा अधिक जमा करता येतात !

पूर्णिमाः किंवा खरंच, खरंच मला काहीच कळत नाही.

घनश्यामः कल्पनेच्या राज्यातही मन तेच राहतं. का करतो मी कल्पना ? मला काय हवंय ? मी आहे असा राह्यला नकोय का मला ? मुळापासून बदलायचंय मला ? की प्रवाही व्हायचंय ? की नाहीसंच व्हायचंय ? मी एवढा घट्ट आणि स्थिर कसा ? असह्य ? जणू काही मला माझ्यातून सुटायचं आहे असं समजत नुसतंच सुख मिळवणं चाललंय का हे ? माझ्या खोटेपणाचं मूळ मला खरंच पाह्यचं आहे का ? की माझा खोटेपणा विसरण्यासाठी मला साध्या, सरळ गोष्टींना विकृत करायचंय ? फुटक्या भिंगातून दिसणाऱ्या दृश्यासारखं ? म्हणजे मी स्वतःच एक फुटकं भिंग ?...की मी आहे असाच खरा आहे असं समजावं ?...आणि तरीही मग -- मला काय हवंय ? ...
( सगळे एकदम घाई सुरू करतात. लगीनघाई. हातातल्या ताटांतून एकमेकांना अक्षता वाटल्याचा अभिनय करतात. हातांत अक्षता घेऊन सुहास्य चेहऱ्यांनी-- अर्थात तशाच काळ्या -- मंचावरून उतरून पुढे येऊन प्रेक्षकांसमोर उभे राहतात.)

चौघेहीः ( जोरात ओरडतात ) अरे, वाजवा रे वाजवा !!! ( बँड, सनई, ताशा,इ.धडाधडा सुरू होतात.)

चौघेहीः ( प्रेक्षकांच्या दिशेने अक्षता फेकत )
शुभमंगल ऽ सावधान !
शुभमंगल ऽ सावधान !
शुभमंगल ऽ सावधान !( हे चालू असतानाच -- )

...पडदा पडत जातो...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा., चिंतामणीनगर, सहकारनगर नं.२, पर्वती, पुणे - ४११ ००९. **दूरध्वनी - ४२२ ७८४७.**